**सन २०१९-२० शासकीय अभिकरणाकडून समुपयोजनासाठी (जळाऊ लाकूड व दगडी कोळसा) (२४०६ ०४८१) या योजनेंतर्गत यवतमाळ, गडचिरोली, चंद्रपूर व अमरावती या वनवृत्तातील कामाकरिता निधी वितरण करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१९१/फ-९**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- २२ नोव्हेंबर, २०१९

**वाचा :-**

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि. ०८.०७.२०१९
२. प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष- १/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.२०/१२९८/२०१९-२०, दि. १९.११.२०१९
३. वनसंरक्षक (प्रा.) यवतमाळ यांचे पत्र क्र.अ/मुवसं/ब/कक्ष-१/योजना/९६३/२०११९-२०, दिनांक ०७.११.२०१९
४. मुख्य वनसंरक्षक (प्रा.) गडचिरोली यांचे पत्र क्र.कक्ष-२(१)/योजना/ब/२०१९-२०/१००८, दिनांक ०८.११.२०१९
५. मुख्य वनसंरक्षक (प्रा.) चंद्रपूर यांचे पत्र क्र.कक्ष-२(१)/योजना/२०१९-२०/१५२८, दिनांक ११.११.२०१९
६. मुख्य वनसंरक्षक (प्रा.) अमरावती यांचे पत्र क्र.कक्ष-१/यो/९१०/२०१९-२०, दिनांक १९.११.२०१९

**प्रस्तावना :-**

सन २०१९-२० राज्य योजनेअंतर्गत शासकीय अभिकरणाकडून समुपयोजन (जळाऊ लाकूड व दगडी कोळसा) (२४०६ ०४८१) या लेखाशिर्षांतर्गत रुपये ७००.०० लक्ष नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पीत आहे.

वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ च्या परिपत्रकान्वये वित्तीय वर्ष २०१९-२० च्या अर्थसंकल्पीय तरतूदींची मासिक निधी विवरणपत्रे अर्थसंकल्प अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणालीवर (BEAMS) प्रशासकीय विभागांकडून नोंदविण्यात आल्यानंतर सन २०१९-२० च्या प्रथम नऊ माहीकरीता (डिसेंबर,२०१९ अखेर) आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाचा अर्थसंकल्पीत निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ६० टक्केच्या मर्यादेत अर्थसंकल्पीय अंदाज नियंत्रण व संनियंत्रण प्रणालीद्वारे वितरीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात आली आहे. त्याअनुषंगाने (२४०६ ०४८१) या लेखाशिर्षांतर्गत रुपये ७००.०० लक्षपैकी रु.४२०.०० लक्ष इतका निधी वितरित करण्यास मंजूरी देण्यात आली आहे. सदर योजनेंतर्गत आतापर्यंत विविध शासन निर्णयान्वये रु.२३३.३२ लक्ष इतका निधी वितरीत करण्यात आला असून, रु.१८६.६८ लक्ष इतका निधी वितरीत करण्यासाठी शिल्लक आहे.

मंजूर अर्थसंकल्पीय नियतव्ययाच्या अनुषंगाने वनसंरक्षक (प्रा.) यवतमाळ, मुख्य वनसंरक्षक (प्रा.) गडचिरोली, चंद्रपूर व अमरावती या वनवृत्ताकडून संदर्भ क्र.३, ४, ५ व ६ अन्वये एकूण रु.३२८.२७ लक्षचा चालू बाब प्रस्ताव प्राप्त झालेले आहेत. सदर प्रस्ताव संदर्भ क्र.२ नुसार प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व

विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी प्रस्तावास शासन मंजूरी प्रदान करुन अनुदान उपलब्ध करुन देण्याबाबत विनंती केली आहे. त्यानुसार या कामासाठी अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**<u>शासन निर्णय:-</u>**

प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यानी संदर्भ क्र.२ नुसार सादर केलेला प्रस्ताव व वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील परिपत्रक विचारात घेता प्रस्तावातंर्गत मागणी लक्षात घेऊन, शासकीय अभिकरणाकडून समुपयोजन (जळाऊ लाकूड व दगडी कोळसा) (२४०६-०४८१) या योजनेमधून वनसंरक्षक (प्रा.) यवतमाळ, मुख्य वनसंरक्षक (प्रा.) गडचिरोली, चंद्रपूर व अमरावती या वनवृत्तातील कामाकरिता सन २०१९-२० करीता खालील तक्त्यात दशविल्यानुसार **एकूण रु.१८३.८० लक्ष इतका निधी** (२४०६-०४८१) या लेखाशिर्षा अंतर्गत खालील विहीत केलेल्या अटी व शर्तीस अधिन राहून वितरीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

**(रु.लाखात)**

| अ. क्र. | वनवृत्त | प्रस्तावाची रक्कम | ०२-मजूरी | १३-कार्यालयीन खर्च | १४-भाडेपट्टी व कर | २१-पुरवठा व सामग्री | २६-जाहिरात व प्रसिध्दी | २७-लहान बांधकामे | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | यवतमाळ | १०.९६ | १०.४२ | -- | -- | ०.५४ | -- | -- | १०.९६ |
| २ | गडचिरोली | २२९.८३ | ७९.७२ | १.०० | -- | ३.३४ | १.३० | -- | ८५.३६ |
| ३ | चंद्रपूर | ७.३६ | ४.४१ | -- | -- | २.९५ | -- | -- | ७.३६ |
| ४ | अमरावती | ८०.१२ | ८०.१२ | -- | -- | -- | -- | -- | ८०.१२ |
| | **एकूण :-** | | **१७४.६७** | **१.००** | **---** | **६.८३** | **१.३०** | **--** | **१८३.८०** |

अटी व शर्ती खालीलप्रमाणे आहेत:-

१. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे राहतील. त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे.
२. उपरोक्त खर्च विहीत कार्यपध्दतीनुसार तसेच अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध मासिक निधी प्रवाहानुसार खर्च करण्यात यावा. यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.
३. नियंत्रक अधिकाऱ्यांना सूचित करण्यात येते की, एकूण वितरीत केलेल्या/करण्यात येणाऱ्या तरतूदीपेक्षा कोणत्याही परिस्थितीत अतिरिक्त खर्च होणार नाही, याची दक्षता घ्यावी.
४. सदर तरतूद खर्च करतांना वित्त विभागाने वेळो वेळी घालून दिलेल्या अटी व शर्तीचे पालन करावे.
५. संस्थेने आर्थिक वर्ष २०१९-२० मध्ये मंजूर व वितरीत अनुदानाच्या मर्यादेत खर्च सिमित ठेवावा.

६. सदरहू मंजूर करण्यात आलेले अनुदान संबंधित कोषागारातून काढून घेतल्यानंतर काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शिर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

७. संस्थेने मागील वर्षाकरिता त्यांना उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानाच्या विनियोगाबाबतचे प्रमाणपत्र शासनास तसेच महालेखापालांना तात्काळ सादर करावे. त्याचप्रमाणे, आता वितरित करण्यात येत असलेल्या अनुदानाचे तपशिलवार देयक व विनियोग प्रमाणपत्र देखिल (Utilization Certificate) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२ नागपूर व शासनाला तातडीने सादर करावे.

८. वनसंरक्षक (प्रा.) यवतमाळ तसेच मुख्य वनसंरक्षक (प्रा.) गडचिरोली, चंद्रपूर व अमरावती यांनी उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहतील व त्याकरीता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

९. शासन निर्णय दिनांक ०१ डिसेंबर, २०१६ नियम पुस्तिकेत नमुद केल्यानुसार तसेच उद्योग उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय दिनांक २४ ऑगस्ट, २०१७ मध्ये नमूद गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) पोर्टलची कार्यपध्दती नुसार निविदा प्रक्रियेत ई-निविदा प्रणालीचा वापर करावा.

१०. प्रत्यक्ष खर्च करण्यापूर्वी विहीत पध्दतीचे पालन करावे व आवश्यकतेनुसार आहरण करावे.

११. सदर खर्च वित्त विभागाच्या दिनांक ०८.०७.२०१९ चे परिपत्रकातील अटींची पूर्तता होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

१२. सदर मंजूरीस शासन निर्णय क्रमांक एमएससी- २०११/प्र.क्र. १७८/फ-५, दिनांक ३०.९.२०११ च्या परिशिष्टात नमुद केलेल्या अटी व शर्ती बंधनकारक असतील.

उपरोक्त खर्च मागणी क्र.सी-७, प्रधान शिर्ष २४०६-वनीकरण व वन्यजीवन, (०१) (०४), शासकीय अभिकरणाकडून समुपयोजन (जळाऊ लाकूड व दगडी कोळसा) (२४०६-०४८१) या लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० मध्ये उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक ०१.०४.२०१९ व ०८.०७.२०१९ च्या परिपत्रकान्वये तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र/२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७.४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९११२२१२२२१७३८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUJAY DEORAO DODAL

Digitally signed by SUJAY DEORAO DODAL
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=353112ee0fa47f9ff9bedae88f651d09fdb142df5fbce9c004f7eea06d8b9baf, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=a6a471816b9dbfd727f2e5ec4825f4678c8393d846acd1c16b8936c8b3a519c6, ou=REVENUE AND FOREST, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SUJAY DEORAO DODAL
Date: 2019.11.22 12:24:23 +05'30'

**( सुजय दोडल )**
**सह सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**

**प्रत :-**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर

२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर

३. मुख्य वनसंरक्षक (प्रा.) गडचिरोली, चंद्रपूर व अमरावती

४. वनसंरक्षक (प्रा.) यवतमाळ

५. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.

६. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारत-३), मंत्रालय, मुंबई-३२.

७. वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन, मंत्रालय, मुंबई-३२.

८. नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.

९. कार्यासन अधिकारी, फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

१०. कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)